**"जिल्हा ज्येष्ठ नागरिक समन्वय संनियंत्रण समिती" गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. डीडीपी -२०१९/प्र.क्र.३११/सामासु**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दि. ३१ ऑक्टोबर, २०१९

**प्रस्तावना-**

भारतीय संविधानातील राज्य धोरणाची निर्देशक तत्वातील अनुच्छेद ३९ क व ४१ मधील तरतूदीनुसार ज्येष्ठ नागरिकांना वृध्दापकाळ चांगल्या त-हेने घालविता यावा, समाजामध्ये त्यांचे जीवन सुसहय व्हावे, शारिरीक व मानसिक आरोग्य सुस्थितीत रहावे यासाठी राज्याचे सर्वसमावेशक धोरण दि. ९ जुलै, २०१८ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहे.

आई-वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याणासाठी नियम २०१०, दि. २३ जून, २०१० च्या अधिसूचनेद्वारे प्रसिध्द करण्यात आले आहेत. सदर नियम २०१० मधील नियम २२ नुसार जिल्हास्तरावर अधिनियमाच्या प्रभावी तथा समन्वित अंमलबजावणीसाठी आणि सल्ला देण्यासाठी प्रत्येक जिल्हयाकरिता ज्येष्ठ नागरिकांसाठी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली "जिल्हा ज्येष्ठ नागरिक समन्वय संनियंत्रण समिती" स्थापन करण्याबाबत तरतूद आहे. त्यानुसार प्रत्येक जिल्हयाकरिता मा.जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली "जिल्हा ज्येष्ठ नागरिक समन्वय संनियंत्रण समिती" स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

आई-वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याणासाठी नियम २०१९, दि. २३ जून, २०१० च्या अधिसूचनेमधील नियम २२ नुसार, प्रत्येक जिल्हयाकरिता मा.जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे **जिल्हा ज्येष्ठ नागरिक समन्वय संनियंत्रण समिती** गठीत करण्यात येत आहे.

सदर समितीची रचना पुढीलप्रमाणे-

| अ.क्र. | पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. | सह अध्यक्ष |
| ३ | सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण | सदस्य सचिव |
| ४ | जिल्हा समाजकल्याण अधिकारी | सदस्य |
| ५ | मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायत | सदस्य |
| ६ | महाराष्ट्र ज्येष्ठ नागरिक संघ यांचे २ प्रतिनिधी | सदस्य |
| ७ | जिल्हा पोलीस अधिक्षक | सदस्य |
| ८ | जिल्हा आरोग्य अधिकारी | सदस्य |
| ९ | जिल्हा महिला बालविकास अधिकारी | सदस्य |

२. **कार्ये-** १) जिल्हास्तरावर अधिनियमाची प्रभावी अंमलबजावणी करणे आणि समस्या निवारणाच्या अनुषंगाने सल्ला देणे.

२) तसेच ही समिती जिल्हा स्तरावर राज्य शासन विनिर्दिष्ट करेल अशी व ज्येष्ठ नागरिकांच्या संबंधात अन्य कर्तव्ये पार पाडील.

३. उपरोक्त जिल्हा ज्येष्ठ नागरिक समन्वय संनियंत्रण समितीचा कार्यकाल किमान १ वर्षाचा किंवा जोपर्यंत जिल्हाधिकारी सदरची जिल्हा ज्येष्ठ नागरिक समन्वय संनियंत्रण समिती बरखास्त करीत नाही तोपर्यंत राहील.

४. सदर समितीची आवश्यकतेनुसार ३ महिन्यातून किमान एकदा बैठक घेण्यात यावी. सदर बैठकीकरिता ज्येष्ठ नागरिक सदस्यांना आवश्यक तो बैठक भत्ता अदा करण्यात यावा .

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१९१०३११५५३३६०५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SANJAY GIRIDHAR PATIL

Digitally signed by SANJAY GIRIDHAR PATIL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0f7d1eee7567d430eefd928eefa78ed2a6072c4ce8f3c0aa4efaf26d9c32daeb, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=bd10fe5a55495bc381e7b4d4b658250c74eb3f55113a21fd21c8620f04c2c257, ou=SOCIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJAY GIRIDHAR PATIL
Date: 2019.10.31 15:56:35 +05'30'

**( सं. गि. पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री ( सर्व) यांचे खाजगी सचिव
४) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
५) सर्व अपर मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
६) सर्व प्रधान सचिव/सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग) मंत्रालय,मुंबई
७) मा.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
८) सर्व विभागीय आयुक्त
९) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
१०) सर्व पोलीस आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) सर्व पोलीस अधिक्षक
१३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
१४) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१५) सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग
१६) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जि.प.
१७) प्र.स. (सा.न्या.) यांचे स्वीय सहाय्यक
१८) निवडनस्ती.